सेवाप्रवेश नियम---

प्रस्तावित सेवाप्रवेश नियमानुसार मागणीपत्र न पाठविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:एसआरव्ही-२००२/प्र.क्र.११/२००२/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-१६ ऑगस्ट, २००२.

वाचा - १) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-एसआरव्ही/१०७४/१५५८-डी-२, दि.७.१.७५.
२) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-आरटीआर/१०७७/४२७६/१२, दि.१५.३.७९.
३) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-आरटीआर-१०८५/१३३१/प्र.क्र.३२/१२, दि.१५.१.९४.

# परिपत्रक

राज्य शासनाच्या अखत्यारीतील विभिन्न पदांचे सेवाप्रवेश नियम संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खाली अधिसूचित करण्याबाबत या विभागाने वेळोवेळी सर्व मंत्रालयीन विभागाना सूचना दिलेल्या आहेत. मात्र सेवाप्रवेश नियम अंतिमत: अधिसूचित झाले नसताना काही मंत्रालयीन विभागांद्वारे प्रस्तावित सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठवून पद भरतीची जाहीरात देण्याबाबत विनंती केली जाते. तथापि सध्या अस्तित्वात असलेल्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदी आणि प्रस्तावित सेवाप्रवेश नियमातील तरतुदी यांच्यामध्ये तफावत असल्यास पद भरतीच्या जाहीरातीस न्यायालयात आव्हान दिले जाते. प्रस्तावित सेवाप्रवेश नियम वैधानिक नसल्याने न्यायालयाद्वारे जाहीरात रद्दबातल ठरविण्यात येते. त्यामुळे प्रस्तावित सेवाप्रवेश नियमानुसार मागणीपत्र न स्विकारण्याचा आणि जाहीरात न देण्याचा आयोगाने निर्णय घेतला आहे.

२. आयोगाचा उपरोक्त निर्णय सर्व मंत्रालयीन विभागाच्या निदर्शनास आणण्यात येत आहे. तसेच सर्व मंत्रालयीन विभागांना कळविण्यात येते की, वैधानिक सेवाप्रवेश नियम अस्तित्वात असल्याशिवाय आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्यात येऊ नये किंवा पद भरतीची जाहीरात देण्याचा आयोगाकडे आग्रह धरण्यात येऊ नये.

GR-20040415172137002-0100 कृ.मा.प...

३. तसेच अराजपत्रित संवर्गातील पदे भरतानाही काही कार्यालयांकडून निवडमंडळांना/जिल्हा निवड समित्यांना/विभागीय निवड समित्यांनाही प्रस्तावित सेवाप्रवेश नियमांच्या आधारे मागणीपत्र पाठविली जातात असे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. त्यामुळे अराजपत्रित संवर्गातील पदे भरण्याकरिताही प्रस्तावित प्रारुप सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार मागणीपत्र पाठविले जाणार नाही, याची दक्षता सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांनी कृपया घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( बा. बा. नारायणकर
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक,मूळ शाखा,उच्च न्यायालय,मुंबई ,
* प्रबंधक,अपील शाखा,उच्च न्यायालय,मुंबई,
* प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई ,
* सचिव,महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व हक्कदारी), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व हक्कदारी),नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा),नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन,नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरुन),
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती कार्यासन बारा.

*पत्राने.

—x—x—

H-734 (4000-08-02) 1a.

D:\JagkarGawali-D-12